**सामान्य रुग्णालय मालेगांव, जि.नाशिक येथील २५अस्थाई पदे चालू ठेवण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**

सार्वजनिक आरोग्य विभाग

शासन निर्णय क्रमांक- जिरुप-१८१०/६२/प्र.क्र. ३८/आरोग्य-३

मंत्रालय, मुंबई- ४०० ०३२.

दिनांक : २ फेब्रुवारी, २०११.

**वाचा :** १) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र. जिरुप २१०५/प्र.क्र.१३०/आरोग्य-३, दिनांक १.३.२००६.

२) शासन निर्णय सार्वजनिक आरोग्य विभाग क्र.जिरुबां २६०५/मुमं ४८५/प्र.क्र.१५०/आ.३, दिनांक २०.९.२००६.

३) शासन निर्णय, सार्वजनिक आरोग्य विभाग, समक्रमांक, दिनांक २०.१०.२०१०.

**शासन निर्णय :** उपरोक्त अ.क्र.१ येथील शासन निर्णयानुसार जिल्हा रुग्णालयातील व विविध विशेषोपचार कक्षातील कर्मचारी वर्गाचा आकृतीबंधानुसार जिल्हानिहाय कर्मचारी वर्गाची पदे मंजूर करण्यात आली आहेत. तर अ.क्र.२ येथील शासन निर्णयानुसार मालेगाव, जि.नाशिक येथील रुग्णालयाकरीता व तेथील विशेषोपचार कक्षाकरीता जिल्हा रुग्णालयाच्या आकृतीबंधानुसार ग्रामीण रुग्णालय मालेगांव येथील उपलब्ध असलेली पदे विचारात घेऊन २७४ पदे निर्माण करण्यास मान्यता दिली आहे. सदर २७४ अस्थायी पदांपैकी ग्रामीण रुग्णालय, मालेगांव येथे आकृतीबंधानुसार मंजूर असलेली २५ पदे दिनांक ३१.१२.२०१० पर्यंत पुढे चालू ठेवण्यास अ.क्र.३ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली आहे. **सदर पदांचे स्थायीकरण करण्याची कार्यवाही शासनस्तरावर सुरु आहे. ही कार्यवाही अद्याप पूर्ण झाली नसल्याने विचाराधीन** २५ अस्थाई पदे दिनांक १.१.२०११ ते दिनांक २८.२.२०११ पर्यंत पुढे चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. यावरील खर्च खालील लेखाशिर्षातून खर्ची घालण्यात यावा आणि हा खर्च सन २०१०-२०११ या वर्षाकरिता मंजूर झालेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

**मागणी क्रमांक - आर - १**

" २२१० - वैद्यकीय सेवा व सार्वजनिक आरोग्य

०६ - सार्वजनिक आरोग्य

००१ - संचालन व प्रशासन

(०१)(०८)- प्राथमिक आरोग्य केंद्रांचा ग्रामीण रुग्णालयाइतका दर्जा वाढविणे (२२१० ०४१३)"

३. हा निर्णय वित्त विभागाच्या क्र.असंक-१००४/प्र.क्र.१२/(भाग-२)/२००४/वित्तीय सुधारणा-१, दिनांक ४ ऑक्टोबर २००४ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय विभागांना प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा सांकेतांक क्रमांक- २०११०२०३१५४९४५००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

**(सुहास रा. चव्हाण)**
**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

संचालक, आरोग्य सेवा,मुंबई.
सहसंचालक, आरोग्य सेवा (वैद्यकीय) मुंबई (३ प्रती)
सहसंचालक, आरोग्य सेवा (आरोग्य) पुणे.
उपसंचालक, आरोग्य सेवा, नाशिक मंडळ, नाशिक.
जिल्हा शल्य चिकित्सक, जिल्हा रुग्णालय, नाशिक.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक/ मालेगांव.
महालेखापाल, महाराष्ट्र-१/२ (लेखा परिक्षा) (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
वित्त विभाग (व्यय-१३) (अर्थसंकल्प-१९) मंत्रालय, मुंबई.
कार्यासन अधिकारी, सेवा-२, सेवा-३, सेवा-५, अर्थसंकल्प, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई.
निवडनस्ती (आ-३)